**मौजे-हिरज, जिल्हा-सोलापूर येथे रेशीम कोषांची बाजारपेठ उभारणीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत . . .**

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,

## शासन निर्णय क्रमांक: केंपुयो २०१७/प्र.क्र.९२/रेशीम कक्ष

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १५ नोव्हेंबर, २०१८

**वाचा:-**

१) शासन निर्णय, क्रमांक: धोरण २०१७/प्र. क्र. ६/टेक्स-५, दि. १७ फेब्रूवारी, २०१८
२) संचालक (रेशीम), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. रेशीम/कार्या-८/रा.कृ.वि.यो./२०१७-१८/ २०१७ दि. २६ फेब्रूवारी, २०१८
३) संचालक (रेशीम), महाराष्ट्र राज्य, नागपूर, यांचे पत्र क्र. रेशीम/कार्या-८/रा.कृ. वि. यो./कोष बाजारपेठ वाढीव निधी/२०१८/११२५ दि. २ ऑगस्ट, २०१८

**प्रस्तावना:-**

वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ मध्ये राज्यातील रेशीम शेती व रेशीम उद्योगाला चालना देण्यासाठी अनेक योजना हाती घेण्याचे जाहीर करण्यात आले आहे. या अनुषंगाने राज्यातील रेशीम कोष उत्पादक शेतकरी व रिलींग उद्योजक यांनी उत्पादीत केलेले रेशीम कोष व रेशीम सुतास खुली बाजारपेठ उपलब्ध व्हावी म्हणून, मौजे-हिरज, जिल्हा-सोलापूर, येथे कोष व सुताची खरेदी व विक्री बाजारपेठ उभारण्याकरीता संदर्भाधीन १ येथील संचालक (रेशीम) यांनी दि. २६ फेब्रूवारी, २०१८ च्या पत्रान्वये प्रकल्प अहवाल सादर केला आहे. सदर बाजारपेठ उभारणीसाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर यांनी रु. ६५४.२७ लक्ष इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रक व विस्तृत प्रकल्प अहवाल संचालक (रेशीम) यांच्यामार्फत सादर केला आहे. मौजे-हिरज, जिल्हा-सोलापूर येथील रेशीम कोषांच्या बाजारपेठेकरीता रु. ६४७.८० लक्ष व त्यावरील १ टक्के प्रशासकीय खर्च रु. ६.४७ लक्ष असा एकूण रु. ६५४.२७ लक्ष निधी राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून मिळण्यासाठी प्रस्ताव कृषि विभागाला सादर करण्यात आला होता.

बाजारपेठेत शेतक-यांकडून विक्रीस येणारे कोष ग्रीन स्वरुपात (जिवंत) असतात. हे कोष टिकवून ठेवण्यासाठी कोषांचे ड्राईंग व साठवणूकीची सुविधा आवश्यक असल्यामुळे कोष ड्राय करणे व साठवणुकीसाठी Conveyor Hot Air Dryer किंवा Dryer ची सुविधा मौजे-हिरज, जिल्हा-सोलापूर येथील बाजारपेठेत उपलब्ध करुन देण्याचे देखील प्रस्तावित होते. सदर कोष ड्राईंग युनिटसाठी रु. ४०.०० लक्ष निधीचा प्रस्ताव संचालक (रेशीम) यांनी सादर केला होता.

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत योजनांचा निधी मंजूर करण्यासाठी कृषि विभागांतर्गत कार्यरत असलेल्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समिती (SLCC) च्या बैठकीत रु. ६९४.२७ लक्षाचा प्रस्तावाला राज्यस्तरीय प्रकल्प समितीने मान्यता दिली आहे. त्यानुसार मौजे-हिरज, जिल्हा-सोलापूर येथील कोष खरेदी बाजारपेठ उभारणीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

राज्यातील रेशीम उद्योगाला चालना देण्यासाठी मौजे-हिरज, जिल्हा-सोलापूर येथील कोष खरेदी बाजारपेठ उभारण्यास व त्यासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून रक्कम रु. ६४७.८० लक्ष तसेच या प्रकल्प रक्कमेच्या १ टक्के प्रशासकीय व किरकोळ खर्च रु. ६.४७ लक्ष आणि कोष ड्राईंगसाठी Conveyor Hot Air Dryer मशीनरीकरीता रु. २९.७० लक्ष, ड्रायर स्थापित करणे व रेशीम कोष साठवणूकीसाठी रु. १०.३० लक्ष अशा एकूण प्रकल्प किंमत रु. ६९४.२७ लक्ष (रु. सहा कोटी चौ-यानऊ लक्ष सत्तावीस हजार फक्त) इतक्या खर्चास शासन मंजूरी देत आहे.

२. मौजे-हिरज, जिल्हा-सोलापूर येथील कोष खरेदी बाजारपेठ इमारत, कोष ड्राईंगसाठी Conveyor Hot Air Dryer मशीनरी, ड्रायर स्थापित करणे व रेशीम कोष साठवणूक आणि अनुषंगीक कामांचा गोषवारा व खर्चाचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे.

| No. | Particulars of Items | Cost (Rs) |
|---|---|---|
| A) | **Essential Items** | |
| 1 | Cost of Work Portion Building | 32133054.00 |
| 2 | Add 11% For Electrification (5% Internal+6% External) | 3534635.94 |
| 3 | Add 5% For Water Supply & Sanitation | 1606652.70 |
| 4 | Miscellaneous Items | |
| | Compound Wall & Gate | 6633668.00 |
| | Internal Roads (150.00 Rmt.) | 1350000.00 |
| | Parking Arrangements (125.00 Sqm.) | 1000000.00 |
| | Furniture (G. F. & F. F. = 1892.58 Sqm.) | 2838870.00 |
| | Firefighting arrangements Lumsum | 500000.00 |
| | Rain Water Harvesting | 1000000.00 |
| | Land Development (7350.00 Sqm.) | 2205000.00 |
| | **Total (D)** | **15527538.00** |
| | **Sub Total(1+2+3+4)** | **52801880.64** |
| | Add 4% For Contingencies Charges | 1285322.16 |
| | Add 5% For Centages Charges | 1606652.70 |
| | Add 12% For G.S.T. | 6336225.68 |
| | **Sub Total (A)** | **62030081.18** |
| | **Say** | **62030081.00** |
| **B)** | **Option Items** | |
| 1 | More Well,Pump House Lumsum | 500000.00 |
| 2 | Solar Energy System Lumsum | 500000.00 |
| 3 | Paver Block (500.00 Sqm.) | 750000.00 |
| 4 | Gardening (1000.00 Sqm.) | 1000000.00 |
| | **Sub Total (B)** | **2750000.00** |
| | **Total Cost Of Project (A)+(B)** | **64780081.00** |
| C) | **Administrative Expenses 1%** | **647000.00** |
| | **Grand Total (A)+(B)+(C)** | **65427081.00** |
| | **Total Round of to Rupees Thosands** | **65427000.00** |
| **D)** | **Arrangements for Cocoon Dryeing & Storeing** | |
| 1 | Conveyer Hot Air Dryers | 2970000.00 |
| 2 | Installation Of Dryers & Provision For Cocoon Storage | 1030000.00 |
| | **Total Of D (1)+(2)** | **4000000.00** |
| | **Grand Total For Project C + D** | **69427000.00** |

३. वर तक्त्यात नमूद केल्यानुसार मौजे-हिरज, जिल्हा-सोलापूर येथील कोष खरेदी बाजारपेठेच्या अंदाजपत्रकीय कामास पुढील अटीच्या व शर्थींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. काम सुरु करण्यापुर्वी नमूना नकाशा, मांडणी नकाशा, तसेच विस्तृत नकाशा यास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.
२. प्रत्यक्ष काम सुरु करण्यापुर्वी जागेच्या मालकी हक्कांबाबतच्या कागदपत्रांची पुर्तता करुन घ्यावी.
३. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदींबाबत काम करतेवेळी त्याचे सविस्तर विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
४. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र.इएनव्ही-२०१३/क्र.१७७/तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१७ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
५. रेशीम कोष बाजारपेठेचे बांधकाम व अनुषंगीक कामे विहीत मुदतीत पुर्ण करण्याची जबाबदारी संचालक (रेशीम) यांची राहील.
६. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत प्रकल्प मंजूरी समितीने मंजूर केलेल्या निधीतून भागविण्यात यावा. तसेच सार्वजनीक बांधाकाम विभागाने मंजूर केलेल्या अंदाजपत्रकानुसार वाढीव निधीकरीता आवश्यक तो प्रस्ताव राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीकडे सादर करण्याची जबाबदारी संचालक (रेशीम) यांची राहील.
७. प्रकल्पस्थळी बांधकाम सुरु करण्यापुर्वी स्थानिक संस्थांकडून आवश्यक त्या वैधानिक परवानग्या घेण्यात याव्यात.
८. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय, क्र. बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमा २, दि. ७.७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
९. कोष ड्राईंग व स्टोरेज व्यवस्था निर्माण करण्यासाठी आवश्यक यंत्रसामूग्री व साहित्य खरेदी, ही शासनाने वेळोवेळी विहीत केलेली कार्यपध्दती अवलंबून खरेदीची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.
१०. रेशीम कोषांची बाजारपेठ उभारणीनंतर व्यवस्थापन व त्या अनुषांगाने येणा-या खर्चाची तरतूद इतर योजनेतून करण्याची जबाबदारी संचालक (रेशीम) यांची राहील.
११. सदर प्रकल्पावर निधी खर्च करतांना राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सुचनांचे व वित्तीय नियमावलीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
१२. या कामकाजाकरीता उपलब्ध करुन दिलेला निधीचा विनीयोग त्याच कामासाठी करण्याची तसेच निधीचे विनीयोग प्रमाणपत्र कृषि विभागास सादर करण्यासाठी शासनास सादर करण्याची दक्षता संचालक (रेशीम) यांनी घ्यावी.

४. सदर शासन निर्णय, राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत प्रकल्प मंजूरी समितीने दि. २५ जुलै, २०१८ रोजी मौजे-हिरज, जिल्हा-सोलापूर येथील कोष खरेदी बाजारपेठेच्या प्रकल्पास दिलेल्या सहमतीनुसार तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३, विनिमय, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग पाच

दोनमधिल अनुक्रमांक १ नियम क्र. १३४ अन्वये करण्यात आलेल्या सुधारणानुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१११७१०५८५४३९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashish
Anaclet Lopes

Digitally signed by Ashish Anaclet Lopes
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=97c1663938db95bf4b157b5906fb45b17fdf64e8db800c9618de046d6e51497c, serialNumber=4c69f8b7f13f76b97aa93b0d155291c61823c6e1d678a555f6eb04d1a38750cf, cn=Ashish Anaclet Lopes
Date: 2018.11.17 11:10:34 +05'30'

**(आ. अ.लोपिस)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), मुंबई,
२. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), नागपूर,
३. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी), बाह्य लेखापरिक्षा विभाग (नागरी), मुंबई,
४. कोषागार अधिकारी, नागपूर,
५. अपर मुख्य सचिव (कृषि) मंत्रालय, मुंबई-३२,
६. सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
७. उप सचिव (कृषि) तथा सदस्य सचिव, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदूम, मंत्रालय, मुंबई-३२,
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे,
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर,
१०. संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर,
११. सहायक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, पुणे,
१२. रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१, जिल्हा रेशीम कार्यालय, सोलापूर,
१३. निवड नस्ती,

------------------------------------------------------------------------